**अल्पसंख्यांक समाजातील १०० मुलींसाठी शासकीय वसतिगृह बांधकामासाठी शासकीय अध्यापक विद्यालय, उदगीर येथील जागा उपलब्ध करुन देणबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डायट ४५१७/प्र.क्र.१३/१७/प्रशिक्षण.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: १२ जुलै, २०१८

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने MSDP अंतर्गत लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथे अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी १०० प्रवेश क्षमतेच्या इमारत बांधकामासाठी रु. ३१०.०० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिलेली असून याकरिता केंद्र शासनाने जिल्हाधिकारी, लातूर यांच्याकडे निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. अल्पसंख्यांक समाजातील मुलींचे शिक्षणातील सातत्य टिकावे, या समाजातील मुलींना शिक्षणाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात तसेच समाजाची शैक्षणिक उन्नती व्हावी यासाठी अल्पसंख्यांक मुलींचे वसतिगृह होणे आवश्यक असल्याने सदर वसतिगृह बांधकामासाठी शासकीय अध्यापक विद्यालय, उदगीर, जि.लातूर, यांच्या मालकीच्या ३.०९ हेक्टर जागेपैकी १.२० एकर जागा उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासकीय अध्यापक विद्यालय, उदगीर, जि.लातूर या शासकीय अध्यापक विद्यालयाच्या मालकीच्या ३.०९ हेक्टर जागेपैकी १.२० एकर जागा अल्पसंख्यांक समाजातील १०० मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर जागेची मालकी शासकीय अध्यापक विद्यालय, उदगीर यांचीच राहील.
२) सदर जागा वसतिगृहाचे बांधकाम करण्याकरिता अल्पसंख्याक विभागाला केवळ वापरण्यास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.
३) अल्पसंख्याक विभागाने सदर जागेवर वसतीगृह व्यतिरिक्त इतर कोणतेही बांधकाम करु नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०७१२१५३१३४१२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2018.07.12 15:32:02 +05'30'

**( बी. आर. माळी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन मलबारहिल,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. मा.मंत्री,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,यांचे विशेष कार्य अधिकारी.
४. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
५. अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विभाग
७. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हाधिकारी, लातूर
९. शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक) , महाराष्ट्र राज्य, पुणे .
१०.संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, (विद्याप्राधिकरण) पुणे
११.विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर
१२.प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय उदगीर जि. लातूर
१३.शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), लातूर
१४.प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यवसायिक विकास संस्था (DIECPD) लातूर
१५.निवड नस्ती, प्रशिक्षण.